**ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम**

साध्या विहिरींच्या कामासाठी निधी वितरणाची पध्दत लागू करणेबाबत.

## महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन परिपत्रक क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५८/पापु-०७

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, लोकमान्य टिळक मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख: २८ नोव्हेंबर, २०१४

**वाचा :**

१) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४ (अ)/पापु-०७, दि.१७ मार्च,२०१०

२) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७, दि.९ जुलै,२०१४

३) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई यांचे पत्र क्र.पागुशा/प्र.क्र.११३/वासो/२०१४, दि. १३ ऑगस्ट,२०१४

**प्रस्तावना :**

ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी राज्य शासनाने संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मागणी आधारीत लोकसहभागाचे लोकाभिमुख धोरण स्विकारले आहे. या धोरणानुसार ग्रामीण पाणी पुरवठा योजनांची मागणी, आखणी, अंमलबजावणी व देखभाल दुरुस्ती संबंधीत स्थानिक स्वराज्य संस्थांनी करावयाची आहे.

ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमांतर्गत वार्षिक कृती आराखड्यात प्रस्तावित योजना समाविष्ट झाल्यानंतर व योजनांना प्रशासकीय मान्यता मिळाल्यानंतर पाणी पुरवठा योजनांचा विकास तीन टप्प्यात करण्याचे निर्देश शासनाने संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये दिले आहे. या शासन निर्णयानुसार निधी वितरणाची कार्यपध्दती विहितर केली असून ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी निधीचे वितरण चार हप्त्यात करण्याचे निश्चित केले आहे. यातील चौथा हप्ता हा १० टक्के निधीचा असून हा निधी योजना पुढील एक वर्ष यशस्वीरित्या चालविल्यानंतर अदा करण्यात येतो.

संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये राज्यातील ग्रामीण पाणी पुरवठा योजनांची लोकवर्गणी पुर्णत: रद्द करण्याचा शासनाने निर्णय घेतला असून शासनाकडून वितरीत केल्या जाणाऱ्या निधीचे चार हप्ते कायम ठेवले आहे.

ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी योजना एक वर्ष यशस्वीरित्या चालविल्यानंतर वितरीत करावयाच्या १० टक्के निधीची तरतूद ठेवण्यामागचा उद्देश हा केवळ योजना पुर्णत्वानंतर योजनेची सफल चाचणी व्हावी, योजनेचे एक वर्ष कंत्राटदारामार्फत संनियंत्रण व्हावे असा आहे. तथापि, साध्या

विहिरींच्या कामासाठी चाचणी कालावधीची आवश्यकता नसल्याने केवळ साध्या विहिरींच्या कामाकरीता निधी वितरणाचा शेवटचा चौथा हप्ता रद्द करुन विहिरींच्या कामाकरीता सुधारीत निधी वितरण प्रणाली लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन परिपत्रक :

प्रस्तावनेत नमुद केलेली वस्तुस्थिती व कारणमिमांसा विचारात घेवून ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमांतर्गत साध्या विहिरींच्या कामाकरीता निधी वितरणाचे टप्पे खालीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहेत :-

१) निधीचा पहिला हप्ता - ३० टक्के
२) निधीचा दुसरा हप्ता - ३० टक्के
३) निधीचा तिसरा (अंतिम) हप्ता - ४० टक्के.

उपरोक्त प्रमाणे निधी वितरणाचे टप्पे हे केवळ साध्या विहिरींच्या कामाकरीताच लागू राहतील. उर्वरित सर्व ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी निधी वितरणाचे हप्ते हे दिनांक १७ मार्च,२०१० व दिनांक ९ जुलै,२०१४ रोजीच्या शासन निर्णयामध्ये नमुद केल्याप्रमाणे राहतील. ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी लागु असलेल्या इतर अटी व शर्ती साध्या विहिरींच्या कामासाठीही लागु राहतील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक 201411261551429628 असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAVRIKAR AJAY KISHANRAO

Digitally signed by SAVRIKAR AJAY KISHANRAO
DN: CN = SAVRIKAR AJAY KISHANRAO, C = IN, S = Maharashtra, O = WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, OU = WATER SUPPLY AND SANITATION,CID - 917821
Date: 2014.11.28 12:01:37 +05'30'

**(अजय सावरीकर)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ००३२
२. मा.उपमुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

३. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
४. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
५. मा.मंत्री (सर्व), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६. मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. मा.राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
८. सर्व सन्माननीय विधिमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई-४०० ०२१.
९. सर्व अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालयीन विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०.सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
११.विभागीय आयुक्त (सर्व),
१२.संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
१३.मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व), जिल्हा परिषद.
१४.संचालक, समाज कल्याण संचालनालय, पुणे.
१५.संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था, बेलापूर, नवी मुंबई.
१६.महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
१७.महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
१८.मुख्य अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
१९.अधीक्षक अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
२०.कार्यकारी अभियंता (सर्व), ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
२१.मंत्रालयीन इतर सर्व विभाग व त्यांच्या अधिनस्त असलेली सर्व कार्यालये
२२.पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने.
२३.निवडनस्ती, कार्यासन पापु-०७.